**सन २०१८-१९ या आर्थिक वर्षाकरीता (२४०६ A१८५) या लेखाशिर्षाखाली महाराष्ट्र बांबू विकास मंडळाकरीता निधी वितरीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग,**
**शासन निर्णय क्र.बांबू-२०१८/प्र.क्र.२११/फ-९**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
**दिनांक :- १९ जून, २०१८**

वाचा :- १) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दिनांक ०२ एप्रिल, २०१८
२) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे क्र. कक्ष १/पी/यो/नबाप्र/प्र.क्र.५०/(बांबू मंडळ)/४१९/१८-१९, दि. १३.०६.२०१८ रोजीचे पत्र.

**प्रस्तावना :-**

राज्य योजनेंतर्गत सन २०१८-१९ आर्थिक वर्षाकरीता महाराष्ट्र बांबू विकास मंडळाची स्थापना (२४०६ A१८५) या लेखाशिर्षाखाली रू. ८००.०० लक्ष इतका नियतव्यय मंजूर व अर्थसंकल्पीत आहे. वित्त विभागाच्या दिनांक ०२.०४.२०१८ रोजीच्या परिपत्रकान्वये सन २०१८-१९ करिता महसूली शिर्षांतर्गत एप्रिल ते डिसेंबर या ९ महिन्यांच्या कालावधीकरिता ७०% च्या मर्यादेत अर्थसंकल्पीय प्रणालीवर रु.५६०.०० लक्ष इतका निधी वितरीत करण्याकरिता उपलब्ध करुन देण्यात आला आहे. त्यानुसार अर्थसंकल्पीत नियतव्ययाच्या अनुषंगाने सन २०१८-१९ करिता व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र बांबू विकास मंडळ, नागपूर यांचेकडून रु.८००.०० लक्षचा नविन/चालू बाब प्रस्ताव विवरणपत्रासह सादर केला असून संदर्भ क्र.२ येथील दिनांक १३.०६.२०१८ रोजीच्या पत्रान्वये अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी शासनाच्या मान्यतेसाठी सादर केलेला आहे.

त्याअनुषंगाने राज्य योजनेंतर्गत सन २०१८-१९ आर्थिक वर्षाकरीता महाराष्ट्र बांबू विकास मंडळाची स्थापना (२४०६ A१८५) या योजनेकरीता वित्त विभागाच्या दिनांक ०२.०४.२०१८ रोजीच्या परिपत्रकान्वये निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी संदर्भ क्र.२ वरील दिनांक १३.०६.२०१८ रोजीच्या पत्रान्वये शासनास सादर केलेला प्रस्ताव तसेच वित्त विभागाच्या दिनांक ०२.०४.२०१८ रोजीच्या परिपत्रकान्वये दिलेल्या सूचना विचारात घेता प्रस्तावातंर्गत मागणी लक्षात घेऊन,व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र बांबु विकास मंडळ, नागपूर यांना सदर कामाकरीता रु.५६०.०० लक्ष इतका निधी महाराष्ट्र बांबू विकास मंडळाची स्थापना (२४०६ A१८५) या लेखाशिर्षा अंतर्गत खालील विहीत केलेल्या अटी व शर्तीस अधिन राहून वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी सदर निधी या विभागाकडून मंजूर केलेल्या प्रस्तावातील क्षेत्र / कार्यक्रम / कामे यावरच खर्च होईल व कामाची द्विरुक्ती होणार नाही आणि मंजूर कामांव्यतिरिक्त कोणत्याही नवीन बाबीवर /नवीन क्षेत्रावर/ नवीन कामांवर खर्च करण्यात येणार नाही याची दक्षता घ्यावी.
२. उपरोक्त खर्च विहीत कार्यपध्दतीनुसार तसेच अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर उपलब्ध मासिक निधी प्रवाहानुसार खर्च करण्यात यावा. यामध्ये कोणतीही वित्तीय अनियमितता होणार नाही याची दक्षता घेण्यात यावी. सदरहू रक्कम खर्ची पडल्यानंतर त्याचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर करावे.
३. सदरहू निधी वितरित करण्यापूर्वी प्रस्तावानुसार योजनेतील निश्चित केलेल्या कामांना सक्षम अधिका-यांची तांत्रिक व प्रशासकीय मंजूरी प्राप्त आहे याची खात्री अपर प्रधान मुख्यवनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन विकास), म.रा. नागपूर यांनी करुन घ्यावी.
४. वाटप करण्यात येणा-या अनुदानातून खर्च करताना यामध्ये कोणतीही वित्तिय अनियमितता होणार नाही याची दक्षता घ्यावी. तसेच सदरहू कामे करतांना वन (संवर्धन) कायदा १९८०, भारतीय वन अधिनियम, १९२७, वन्यजीव (संरक्षण) अधिनियम १९७२ मधील तरतुदींचा भंग होणार नाही याची दक्षता घ्यावी.
५. सदर कामांच्या गुणवत्तेबाबत प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी वेळोवेळी आवश्यकतेनुसार तपासणी करावी.
६. सर्व कामे दर्जेदार होतील याबाबत योग्य शासन कार्यप्रणालीचा वापर केला जाईल व कोणतीही अनियमितता होणार नाही याची सर्व जबाबदारी व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र बांबू विकास महामंडळ, नागपूर यांची राहील.
७. मागील वर्षी सदर योजनेकरिता वितरित केलेल्या निधीच्या विनियोगाबाबतचे प्रमाणपत्र सादर केले जाईल याची दक्षता घ्यावी.
८. प्रत्यक्ष खर्च करण्यापूर्वी विहीत पध्दतीचे पालन करावे व आवश्यकते नुसार आहरण करावे.
९. सदर खर्च वित्त विभागाच्या दिनांक ०२.०४.२०१८ च्या परिपत्रकातील व त्यासोबतच्या परिशिष्टामध्ये नमूद केलेल्या अटीची पूर्तता होईल, याची दक्षता घेण्यात यावी.
१०. सदर मंजूरीस शासन निर्णय क्रमांक एमएससी- २०११/प्र.क्र. १७८/फ-५, दिनांक ३०.९.२०११ च्या परिशिष्टात नमुद केलेल्या अटी व शर्ती बंधनकारक असतील.
११. शासन निर्णय दिनांक ०१ डिसेंबर, २०१६ अनुसार नियम पुस्तिकेत नमुद केल्यानुसार निविदा प्रक्रियेत खरेदी किंमत रु.तीन लाख व त्यापेक्षा अधिक असल्यास ई-निविदा प्रणालीचा वापर करावा.

सदर योजनेवर होणारा खर्च मागणी क्र.सी-७, ०१-वनिकरण प्रधान शिर्ष- २४०६, वनिकरण व वन्यजीवन, १०५ वनोत्पादने, (०१) शासकीय अभिकरणाकडून समुपयोजन, (०१) (०८) महाराष्ट्र बांबू विकास मंडळाची स्थापना (२४०६ A१८५) या लेखा शिर्षाखाली सन २०१८-१९ या आर्थिक वर्षात उपलब्ध असलेल्या अनुदानातून भागविण्यांत यावा.

सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या दिनांक ०२.०४.२०१८ च्या परिपत्रकान्वये तसेच वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र.विअप्र/२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनिमय, भाग-२, दिनांक १७.०४.२०१५ मधील भाग पहिला, उपविभाग-३, परिच्छेद २७ (२) अन्वये विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.inया संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०६१९१६०२५८६७१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

Sujay Dodal

Digitally signed by Sujay Dodal
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue and Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=353112ee0fa47f9ff9bedae88f651d09fdb142df5fbce9c004f7eea06d8b9baf, cn=Sujay Dodal
Date: 2018.06.19 16:02:20 +05'30'

**( सुजय दोडल )**
**सह सचिव (वने)**
**महसूल व वन विभाग**

**प्रत :-**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर
२. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प,नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर
३. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र बांबू विकास मंडळ, नागपूर.
४. महालेखापाल-१/२ (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर.
५. वित्त विभाग, व्यय-१० कार्यासन, मंत्रालय, मुंबई-३२.
६. नियोजन विभाग (का-१४७५), मंत्रालय, मुंबई-३२.
७. फ-२/ब-१ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
८. कार्यासन फ-९, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.(निवडनस्ती)